**महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्टअप धोरण या योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत. (सन २०२२-२३ लेखाशिर्ष मागणी क्रमांक झेडए-२ (२२३० ए ३३४)**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०२३/प्र.क्र.५३/कौशल्य-२**

२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२३

<u>वाचा</u> : १. शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२
२. कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग ज्ञापन क्र.कौविउ-२०२२ / प्र.क्र.१०६/ कौशल्य-१, दिनांक २५ जुलै, २०२२.
३. महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई यांचे दिनांक २५ जानेवारी,२०२३ रोजीचे पत्र.
४. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १६ मार्च, २०२३.

**<u>प्रस्तावना :</u>**

महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्टअप धोरण या योजनेंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये, रु. ८.१९ कोटी (अक्षरी रुपये आठ कोटी एकोणीस लाख फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास संदर्भाधीन क्र. २ येथील ज्ञापनान्वये मान्यता देण्यात आली आहे. महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्र.३ अन्वये, महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्टअप धोरण या योजनेंतर्गत, सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये, लेखाशिर्ष मागणी क्र. झेडए-२ (२२३० ए३३४) अंतर्गत अर्थसंकल्पीय तरतूदीमधील निधी उपलब्ध करून देण्याबाबतची विनंती शासनास केली आहे. त्यानुसार महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्टअप धोरण या योजनेंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता लेखाशिर्ष मागणी क्र. झेडए-२ ( २२३० ए३३४ ) अंतर्गत अर्थसंकल्पीय तरतूदीमधील उर्वरित रू.१९.११ कोटी इतका निधी ( अक्षरी रुपये एकोणवीस कोटी अकरा लाख फक्त ) वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्टअप धोरण या योजनेंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता लेखाशिर्ष मागणी क्र. झेडए-२ ( २२३० ए३३४ ) अंतर्गत खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :

**(रु.कोटीमध्ये)**

| **लेखाशिर्ष क्रमांक** | **अर्थसंकल्पीय तरतूद** | **सुधारित अर्थसंकल्पीय तरतूद** | **यापूर्वी वितरीत करण्यात आलेला निधी** | **या शासन निर्णयान्वये वितरीत निधी** | **एकूण निधी** |
|---|---|---|---|---|---|
| मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, (०१) (१३) महाराष्ट्र नाविण्यपूर्ण स्टार्टअप धोरण, लेखाशिर्ष २२३०ए ३३४, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | ३९ | २७.३० | ८.१९ | १९.११ | २७.३० |

२. सदरहू खर्च मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, (०१) (१३) महाराष्ट्र नाविण्यपूर्ण स्टार्टअप धोरण लेखाशिर्ष २२३० ए ३३४, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. याकरिता आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यांना नियंत्रण अधिकारी, सहायक संचालक, लेखा यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी यांना "नोडल एजन्सी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर निधी आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांनी महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी यांचेकडे वर्ग करुन याबाबतचे लेखे स्वतंत्र व अद्ययावत ठेवावेत. उपरोक्त निधी ज्या कारणास्तव उपलब्ध करुन देण्यात आला आहे त्याच कारणास्तव खर्च करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी यांची राहील.

तसेच प्रत्यक्ष खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित कालमर्यादेत सादर करण्याची दक्षता घ्यावी. उक्त निधी खर्च करताना वित्त व नियोजन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना/अटी व शर्तींचे पालन करावे.

५. सदरहू शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.११३/१४७१, दिनांक १५ मार्च, २०२३ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१०९/व्यय-६, दिनांक २५ मार्च, २०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२८१५०१०७५५०३ असा आहे. हा आदेश डिजीटल साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Manjusha Amit Karande
Date: 2023.03.29 13:14:39 +05'30'

**( मंजुषा कारंडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई
४. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे.
६. अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई,
७. कार्यासन अधिकारी, (प्रशा-३), कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
९. निवड नस्ती (कौशल्य-२ ), कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.